महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात आस्थापनेवरील खर्चाच्या बाबींकरिता अनिवार्य मंजूर तरतूदीतून खर्चासाठी प्रशासकीय मान्यता.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०१९/प्र.क्र.११/उसाअ/का-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १४/९/२०२०

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : इयुए-१०७५/एलजेजे, दि.१६.४.१९७५
२) अल्पसंख्याक विकास विभाग , शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०१६/प्र.क्र.६(सुधा-१)/ का-४, दि.५.१०.२०१६
३) शासन परिपत्रक, अंर्थस-क्रमांक : अर्थस-२०२०/प्र.क्र.६४/अर्थसंकल्प्-३ दि.१६.४.२०२०

प्रस्तावना :-

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य् अकादमीची स्थापना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात होणा-या आस्थापनेवरील खर्चाच्या बाबीकरिता रु.१९, ८०,०००/-(अक्षरी रुपये एकोणीस लाख ऐंशी हजार फक्त) इतकी अनिवार्य तरतूद मंजूर करण्यात आलेली असून वित्त् विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३५/२०२०/व्यय-१ दि.३.८.२०२० च्या नुसार एप्रिल ते सप्टेंबर, २०२० या ६ महिन्याकरिता मंजूर तरतूदीच्या २०% प्रमाणे रु.३,९६,०००/-(अक्षरी रूपये तीन लाख श्याहन्नव हजार फक्त्) इतका निधी खर्च करण्यास उपलब्ध आहे. सबब, सदर उपलब्ध निधीतून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या आस्थापनेवरील खर्चाच्या बाबीसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात “मागणी क्र. झेडई १,२२०५ कला व संस्कृती, १०२-कला व संस्कृती प्रचालन (००) (०१) उर्दू अकादमीची आस्थापना/दत्तमत, ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (अनिवार्य) (२२०५ ३०२७)” या लेखाशिर्षाखाली रु.१९,८०,०००/-(अक्षरी रुपये एकोणीस लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या अर्थसंकल्पित तरतूदीतून, माहे एप्रिल ते सप्टेंबर, २०२० या दोन त्रैमासिक कालावधीसाठी २०% प्रमाणे रु.३,९६,०००/-(अक्षरी रूपये तीन लाख श्याहन्नव हजार फक्त्) इतक्या निधीतून अकादमीने प्रस्तावित केल्यानूसार पुढीलप्रमाणे खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **उद्दीष्टये** | **सन २०२०-२१ या वर्षाकरिता एप्रिल, २०२० ते सप्टेंबर,२०२० या ६ महिन्यांकरिता प्रस्तावित रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १. | कार्यालयीन खर्च | १,१४,५००/- |
| २. | कार्याध्यक्ष व इतर सदस्यांना प्रवास व दैनिक भत्ते खर्च | ५०,०००/- |
| ३. | कार्याध्यक्षांना मानधन | ३१,५००/- |
| ४. | बैठकीच्या वेळी अल्पपोहार/चहा/कॉफी | ५०,०००/- |
| ५. | उर्दू अकादमीच्या विविध योजनांची उर्दू वर्तमानपत्रांमध्ये जाहिरात देवून अर्ज मागविणे | १,५०,०००/- |
| | **(अक्षरी रुपये तीन लाख श्याहन्व  हजार फक्त)** | ३,९६,०००/- |

**२.** सदरहू रक्कम "मागणी क्र. झेडई १,२२०५ कला व संस्कृती, १०२-कला व संस्कृती प्रचालन (००) (०१) उर्दू अकादमीची आस्थापना/दत्तमत, ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) अनिवार्य (२२०५ ३०२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त् विभागाच्या अनौपचारिक संदर्भ् क्र. १३५/२०२०/व्यय-१, दि.३.८.२०२० च्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच्या संगणक संकेताक २०२००९१५१३४४३५८११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Miniorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaa b6c983897e5318874, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2020.09.15 13:46:12 +05'30'

**(म. स. चौकेकर)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. महालेखापाल १/२ (लेखापरिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १,मुंबई/नागपूर ,
२. संचालक, लेखाव कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अवर सचिव/कक्ष अधिकारी,(का-५) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (का-७)/(का-२) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत)
७. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकासविभाग, मंत्रालय, मुंबई
८. कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
९. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
१०.अ.मु.स. सचिव यांचे स्वीय सहायक, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.)